**कर्मवीर दादासाहेब गायकवाड सबळीकरण व स्वाभिमान योजनेंतर्गत अनुसूचित जाती व नवबौध्द भूमिहिन शेतमजूरांना जमीनीचे वाटप करण्याकरिता सन २०२१-२२या वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आलेला निधी खर्च करण्यासाठी मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक: संकीर्ण-२०२२/प्र.क्र. ७१/अजाक**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: ३० मार्च, २०२२.

<u>ज्ञापन :</u>

आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना कळविण्यात येत आहे की, कर्मवीर दादासाहेब गायकवाड सबळीकरण व स्वाभिमान योजनेंतर्गत अनुसूचित जाती व नवबौध्द भूमिहिन शेतमजूरांना जमीनीचे वाटप करण्याकरिता (लेखाशीर्ष २२२५ ३६१ ८) सन २०२१-२२ या वर्षातील अर्थसंकल्पित निधीपैकी वित्त विभागाने उपलब्ध करून दिलेला रुपये ५० कोटी निधी खर्च करण्यासाठी याद्वारे मान्यता देण्यात येत आहे, याबाबतचे विवरण खालीलप्रमाणे आहे:

**(रुपये हजारात)**

| अ. क्र. | अनुसूचित जाती आणि नवबौद्ध भूमिहिन शेतमजूरांना जमिनीचे वाटप (कर्मवीर दादासाहेब गायकवाड सबळीकरण व स्वाभिमान योजना) | अर्थसंकल्पित निधी रुपये | खर्च करण्यासाठी मान्यता देण्यात येत असलेला निधी रुपये |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | २२२५,<br>३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)<br>२२२५ ३६१ ८ | १५,००,०००<br>(अक्षरी रुपये एकशे पन्नास कोटी फक्त) | ५,००,०००<br>(अक्षरी रुपये पन्नास कोटी फक्त) |

२. सदर निधी खर्च करण्यासाठी आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी व संबंधीत जिल्ह्याचे सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. नियंत्रण अधिकारी यांनी उपरोक्त विवरणातील रकाना ४ मधील निधी खर्च करावा. सदर निधी खर्च झाल्यावर त्याबाबतचे विवरण व उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्यात यावे.

४. शासन परिपत्रक, शासन निर्णय, वित्त विभाग, अनुक्रमे दिनांक ६ एप्रिल, २०२१, दिनांक २४ जून, २०२१, दिनांक २९ जुलै, २०२१,दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१ दिनांक ०३ फेब्रुवारी,२०२२ मधील नमूद केलेल्या प्रत्येक बाबीची पूर्तता झालेली आहे, असे प्रमाणित करण्यात येत आहे.

५. प्रस्तुत योजनेवर होणारा खर्च खालील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून सन २०२१-२२ या वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीतून भागविण्यात यावा:

मागणी क्रमांक एन-३
मुख्य लेखाशीर्ष २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती,
इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण
०१, अनुसूचित जातींचे कल्याण
(०३)(०५), अनुसूचित जाती आणि नवबौद्ध भूमीहीन शेतमजुरांना जमिनीचे वाटप
(अ.जा.उ. यो.)(कार्यक्रम)
३१,सहायक अनुदाने (वेतनेत्तर)
२२२५ ३६१ ८

६. उपरोक्त योजनेंतर्गत मागील वर्षातील खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्रे नियंत्रक अधिकारी यांना तपासण्याच्या अधिन राहून तरतूद खर्च करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी यांची राहील. तसेच वित्तीय नियमावली महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका यानुसार वेळोवेळी वित्त विभागाने निर्गमित केलेल्या अटी व शर्तीनुसार सदर तरतूद खर्च करुन कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्याची जबाबदारी आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांची राहील.

७. नियंत्रक अधिकारी यांनी खर्च करताना शासन परिपत्रक, शासन निर्णय, वित्त विभाग, अनुक्रमे दिनांक ६ एप्रिल, २०२१, दिनांक २४ जून, २०२१, दिनांक २९ जुलै, २०२१,दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१ आणि ०३ फेब्रुवारी २०२२ मधील बाबींची पूर्तता करण्याची दक्षता घ्यावी.

८. सदर ज्ञापन हे वित्त विभागाच्या अनौपाचारिक संदर्भ क्रमांक, ३८३/व्यय-१४, दिनांक २५/०३/२०२२ अन्वये मिळालेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२२०३३०१७०१४३६६२२ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ASHWINI BHIMRAO YAMGAR

Digitally signed by ASHWINI BHIMRAO YAMGAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSITANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=f0b627b3230194fa84bd0e5b4eb590e81c2c15ce998ba19f4825b4ac3eee13ce,
pseudonym=E4B65E741A4E068C8794948A6098246DB7DA095A,
serialNumber=1E31BE6F920A3D606925AB728A537257F35F1F0BE19B929C1B0DDCBA1E89366B, cn=ASHWINI BHIMRAO YAMGAR
Date: 2022.03.30 17:03:24 +05'30'

**(अश्विनी यमगर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई,
२. सर्व मा. संसद सदस्य आणि विधानपरिषद/सभा सदस्य,
३. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
४. मा. मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा. उप मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई,

६. मा. मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. मा. राज्य मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
८. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई,
९. आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
१२. महालेखापाल (लेखापरिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई,
१३. महालेखापाल (लेखापरिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर,
१४. संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१५. सर्व प्रादेशिक उप आयुक्त, समाज कल्याण विभाग,
१६. सर्व सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण,
१७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१८. कोषागार अधिकारी, पुणे,
१९. वित्त विभाग (व्यय-१४ / अर्थसंकल्प-३/७, अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
२०. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प/विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
२१. निवड नस्ती /अजाक.